




**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,मंत्रालय मुख्य इमारत ,पहिला मजला ,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२

**दुरध्वनी क्र. ०२२-२२०४८२४७** Email ID : dokh.rfd@maharashtra.gov.in

---

**क्रमांकः-गौखनि-३८/०९२१/प्र.क्र.७१/ख-१** **दिनांक :- १६ एप्रिल, २०२४.**

**विषय : गौण खनिज-कोल्हापूर**

सन २०१४-१५ करीता मौजे भादोली, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर येथील गट क्र.८३३ ते ८४३ या वाळूगटातून उत्खनन करता न आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम परत मिळणेबाबत.

**श्री. अधिक बबनराव दमामे.**

**शासन ज्ञापनः**

सन २०१४-१५ या वर्षाकरीता घेण्यात आलेल्या वाळूगटांच्या लिलावामध्ये मौजे भादोले, ता. हातकणंगले येथील वाळूगट क्र.८३३ ते ८४३ मधून एकुण २८२६ ब्रास वाळूसाठ्याच्या परिमाणाकरीता श्री. अधिक बबनराव दमामे यांना रुपये ५७,७२,४३२/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला होता. लिलावधारक यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम शासनजमा केल्यानंतर जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी दि.२१/२/२०१५ रोजीच्या आदेशान्वये वाळूगट मंजूर केला. तसेच लिलावधारकास दि.२४/२/२०१५ रोजी वाळूगटाचा प्रत्यक्ष ताबा देण्यात आला.

**०२.** तथापि, लिलावधारक यांनी वाळू उत्खनन सुरु केले असता, वाळू वाहतूकीमुळे रस्ता खराब होणे, शेतीपंप व पिण्याच्या पाण्याची पाईपलाईन नादुरुस्त होवून पिण्याचे पाणी दुषित होणे या कारणांवरुन गावातील शेतकरी यांनी वाळू उत्खनन करणारे कामगार, ट्रक ड्रायव्हर यांना शिवीगाळ व मारहाण करुन वाहनांची नासधुस करत असल्याने सदर वाळू उपसा बंद केल्यामुळे लिलावधारकास वाळूचे उत्खनन करता आले नाही. सबब, लिलावधारकास उत्खनन करता न आलेल्या कालावधीत वाळूची प्रमाणशीर रक्कम रू.२८,९८,४६३/- (रू. अठ्ठावीस लाख अठ्ठयाण्णव हजार चारशे त्रेसष्ट फक्त) इतकी परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**०३.** लिलावधारक श्री. अधिक बबनराव दमाने यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रू.२८,९८,४६३/- (रू. अठ्ठावीस लाख अठ्ठयाण्णव हजार चारशे त्रेसष्ट फक्त) अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.०८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०४१८१२०१०६३४१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.04.18 12:13:05 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, कोल्हापूर**

**प्रतः-**

१) विभागीय आयुक्त, पुणे
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
५) वित्त विभाग (व्यय-९/ अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन ख-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.